**दौंडवाडी साठवण तलाव क्र.२, ता.परळी वैजनाथ, जि. बीड, या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लपात २११४( प्र क्र ६/२०१४)/लपा-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २२ जूलै, २०१४

**पहावे**

१) **कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. गोमपाविम/तां-४/दौंडवाडी सा.त. सुप्रमा १२०५९/ दि. २७.१२.२०१३**

**प्रस्तावना**

शासन निर्णय क्रमांक लपात -२०००/दौंडवाडी सा.त. ४८३/२००० लपा-२ दिनांक २४.०४.२००१ अन्वये एकूण अंदाजित खर्च रु. ६५.७० लक्षच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन १९९९-२००० च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, जास्त दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय**

आता या निर्णयान्वये दौंडवाडी साठवण तलाव क्र.२ ता. परळी वैजनाथ, जि. बीड, या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये १३२.५९ लक्ष (रु. एक कोटी, बत्तीस लक्ष, एकोणसाठ हजार, फक्त) या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठी एकूण रूपये १२०.०९ लक्ष (रू. एक कोटी, वीस लक्ष, नऊ हजार फक्त) व अनुषंगीक खर्च रूपये १२.५० लक्ष (रू. बारा लक्ष, पन्नास हजार फक्त) आहेत. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००९-२०१० या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत), (संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ४९९ २)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय विभाग क्रमांक एपीएच/१०७३/३२६५६ (ई-३) दि.१७.७.७४ नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५३/१४३४, दि. २९.०२.२०१४ अन्वये व वित्त विभागाच्या

अनौपचारीक संदर्भ क्र. १५१/व्यय-१२, दि. ११.०३.२०१४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (७०/२०१४) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१४५५३९१२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2014.07.30 14:53:43 +05'30'

**(डॉ. संजय बेलसरे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, बीड
९. अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ,परळी वैजनाथ
१०. कार्यकारी अभियंता, बीड लपा प्रकल्प विभाग, बीड मु. अंबेजोगाई
११. अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
१४. लपा-२, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : लपात २११४/(प्र.क्र.६/२०१४)/लपा-२, दि. २२.०७.२०१४ चे परिशिष्ट**
**दौंडवाडी साठवण तलाव क्र.२ ता.परळी, जि. बीड**
**उपशिर्षनिहाय तरतूदी**

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १ | 'ए' प्राथमिक | २.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | २४.३७ |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ६९.८७ |
| ४ | “डी” विमोचक | ०.०० |
| ५ | 'के' इमारत | १.०० |
| ६ | "एम" वृक्षरोपन | ०.५० |
| ७ | 'ओ' किरकोळ कामे | २०.०० |
| ८ | 'पी' व्यवस्थापन | ०.३५ |
| ९ | 'आर' दळणवळण | २.०० |
| | **एकुण** | **१२०.०९** |
| | **आनुषंगिक खर्च** | **१२.५०** |
| | **योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष)** | **१३२.५९** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र ३१० हेक्टर आहे.
ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा ७१२ सघमी. आहे.
क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. १८६२२/-
ड) लाभव्यय गुणोत्तर १.२१ > १ सूचीचा मजकूर लिहा.